**मुंबई उच्च न्यायालयाच्या पी.डब्ल्यू.डी. (मुख्य) व पी.डब्ल्यू.डी. (विस्तारीत) इमारतीच्या पॅसेजमधील विद्युतीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एचसीटी-५२२३/प्र.क्र.३४/का.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०६ जुलै, २०२३.

**संदर्भ** :- प्रबंधक मूळ शाखा यांचे पत्र क्र.C.S./Electrical/७७८, दि. १०/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

पोलीस उपायुक्त, सुरक्षा शाखा, मुंबई यांनी मुंबई उच्च न्यायालय इमारतींच्या सुरक्षा उपाययोजनांचा आढावा घेतला असता, पी.डब्ल्यू.डी. (विस्तारीत) इमारतीच्या पॅसेजमधील विद्युत वायर्स/केबल्स या मोकळया अवस्थेत असल्याचे त्यांना आढळून आले . त्यामुळे भविष्यात घडू शकणारी दुर्घटना टाळण्याकरीता उचित उपाययोजना राबविण्याबाबत त्यांनी उच्च न्यायालय प्रशासनास कळविले होते. त्यास अनुसरुन कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग यांनी सन २०२२-२३ च्या दरसुचीनुसार इलेक्ट्रीकल पावर डिस्ट्रीब्युशनच्या नुतनीकरणाबाबतचे व पी.डब्ल्यू.डी. (मुख्य) व पी.डब्ल्यू.डी. (विस्तारीत) इमारतीच्या पॅसेजमधील जुन्या, मोकळया विद्युत वायर्स/केबल्स आणि स्वीचगीयर्स, पॅनेल बदलण्याबाबतचे रु. ५५,६४,३०६/- (जीएसटी व सेंटेज चार्जेसह) इतक्या रकमेचे अंदाजत्रक उच्च न्यायालय प्रशासनास सादर केले होते. त्यास मा. उच्च न्यायालयाच्या इमारत समितीने मान्यता दर्शविली आहे. त्यानुसार पी.डब्ल्यू.डी. (मुख्य) व पी.डब्ल्यू.डी. (विस्तारीत) इमारतीच्या पॅसेजमधील जुन्या, मोकळया विद्युत वायर्स/केबल्स आणि स्वीचगीयर्स, पॅनेल बदलण्यास मान्यतेचा व निधी उपलब्धतेचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्रान्वये उच्च न्यायालय प्रशासनाने शासनास सादर केला आहे. त्यानुसार उच्च न्यायालय प्रशासनाचा सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -:**

मुंबई उच्च न्यायालयाच्या इलेक्ट्रीकल पावर डिस्ट्रीब्युशनच्या नुतनीकरणाबाबतचे व पी.डब्ल्यू.डी. (मुख्य) व पी.डब्ल्यू.डी. (विस्तारीत) इमारतीच्या पॅसेजमधील जुन्या, मोकळया विद्युत वायर्स/केबल्स आणि स्विचगीयर्स, पॅनेल यांचे केस फिटींग करणे / त्याजागी नवीन वायर्स/केबल्स,

स्वीचगियर्स व पॅनल कार्यान्वित करण्यास व त्याअनुषंगाने येणाऱ्या रु. ५५,६४,३०६/- (रुपये पंचावन्न लक्ष चौसष्ट हजार तीनशे सहा फक्त) इतक्या अदांजपत्रकीय खर्चास वित्तीय

अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-५, नियम क्र. १३४, अनुक्रमांक ५ अंतर्गत अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदरहू काम हे शासनाच्या विहीत कार्यपध्दतीचा तसेच त्यासंबंधीच्या अटी/शर्तींचा अवलंब करुन करण्यात यावे.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२-उच्च न्यायालये, (०२) (०१) प्रबंधक, मुळ शाखा (२०१४ ००७४) (अनिवार्य) अंतर्गत २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४९९/व्यय-५, दि. १४/०५/२०२३ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.go.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१२१६३२०११५१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढ़ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA RAMCHANDRA JADHAV

Digitally signed by MAHENDRA RAMCHANDRA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=3971ec243f15cd8a25bfd6dbaf74efe04f80d57c22e473eb8eaac7ac344ac25a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=846337C71F3B3405F8D8448578B4ED3DDBE6ED2DB306E26977B3CDCCDDC27F14, cn=MAHENDRA RAMCHANDRA JADHAV
Date: 2023.07.12 16:32:59 +05'30'

**( महेंद्र रा. जाधव )**

**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.

प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.

महालेखापाल ) लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता(, महाराष्ट्र-एक, मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.

विधि व न्याय विभाग (कार्या.२३/२४), मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती.